GR-200408121203346001-2402

अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयाकरिता न्यायाधिकरणाची स्थापना करणे...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक: युएसजी १२९१/२०८९/विशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक: १९ ऑगस्ट, १९९५

प्रस्तावना :- राज्यातील अकृषि विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालयांचे व्यवस्थापन व त्यांचे कर्मचारी यांच्यातील वादांबाबत/तंटे, न्यायनिवाडा करण्यासाठी महाराष्ट्रातील अकृषि विद्यापीठाकरिता एकूण तीन न्यायाधिकरणे कार्यान्वित आहेत. न्यायाधिकरणांचे ठिकाण व त्यांचे कार्यक्षेत्र खालील दर्शविल्याप्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | न्यायाधिकरणाचे नाव | कार्यक्षेत्र |
|---|---|---|
| १] | महाविद्यालयीन न्यायाधिकरण, मुंबई | मुंबई विद्यापीठ, मुंबई व एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालयातील कर्मचाऱ्यांसाठी. |
| २] | महाविद्यालयीन न्यायाधिकरण, पुणे. | पुणे विद्यापीठ, पुणे व शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर या विद्यापीठांशी संलग्नित महाविद्यालयातील कर्मचाऱ्यांसाठी. |
| ३] | महाविद्यालयीन न्यायाधिकरण, औरंगाबाद. | मराठवाडा, नागपूर व अमरावती विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालयातील कर्मचाऱ्यांसाठी. |

दिनांक २२ जुलै, १९९४ पासून सर्व अकृषि विद्यापीठांसाठी महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ अस्तित्वात आला आहे. सदर कायद्यामध्ये कलम ५८ अन्वये प्रत्येक विद्यापीठाकरिता न्यायाधिकरण स्थापन करण्याची तरतूद आहे.

शासन निर्णय :- महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ च्या कलम ५८ अन्वये महाराष्ट्रातील प्रत्येक अकृषि विद्यापीठाकरिता पुढे दर्शविल्याप्रमाणे न्यायाधिकरण स्थापन करण्यास शासन या निर्णयान्वये मान्यता देत आहे :-

....कृ.मा.प.

| अ. क्र. | विद्यापीठाचे नांव | कार्यक्षेत्र [जिल्हा] |
|---|---|---|
| १] | मुंबई विद्यापीठ, मुंबई | बृहन्मुंबई, मुंबई उपनगर, रायगड, ठाणे, रत्नागिरी, सिंधुदुर्ग. |
| २] | पुणे विद्यापीठ, पुणे | पुणे, अहमदनगर, नाशिक |
| ३] | शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | कोल्हापूर, सातारा, सांगली, सोलापूर |
| ४] | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | औरंगाबाद, बीड, जालना, उस्मानाबाद |
| ५] | स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | नांदेड, परभणी, लातूर |
| ६] | उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव, | जळगांव, धुळे |
| ७] | नागपूर विद्यापीठ, नागपूर | नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, वर्धा. |
| ८] | अमरावती विद्यापीठ, अमरावती | अमरावती, अकोला, बुलढाणा, यवतमाळ |
| ९] | श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ. | संपूर्ण महाराष्ट्र |

प्रत्येक न्यायाधिकरणाकरिता खाली दर्शविल्याप्रमाणे कर्मचारी पदे मंजूर करण्यात येत आहेत :-

| अ. क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १] | पीठासन अधिकारी | १ | रु. ८,०००/- [उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्तींचे वेतन] |
| २] | लघुलेखक [निम्नश्रेणी] | १ | रु. १४००-४०-१६००-५०-२३००-द. रो.-६०-२६०० |
| ३] | कनिष्ठ लिपिक/टंकलेखक | १ | रु. ९५०-२०-११५०-द. रो.-२५-१५०० |
| ४] | शिपाई | १ | रु. ७५०-१२-८७०-द. रो.-१४-९४० |

वरील सर्व पदधारकांना नियमानुसार मिळणारे इतर भत्ते देय राहतील.

न्यायाधिकरणावर पीठासन अधिकारी म्हणून नियुक्ती करण्याकरिता खाली दर्शविलेले पात्रताधारकच फक्त पात्र ठरविण्यात येऊ शकतील:-

[अ] ती व्यक्ती उच्च न्यायालयाची न्यायाधीश असावी किंवा न्यायाधीश राहिलेली असावी.

[ब] ती व्यक्ती उच्च न्यायालयाचे न्यायाधीश म्हणून नियुक्ती करण्याकरिता पात्र असावी. परंतु [ब] मध्ये दर्शविलेल्या पात्रताधारकांची नियुक्ती मुंबई उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायाधिशांनी शिफारस केलेल्या तीन व्यक्तींमधून असावी.

पीठासन अधिकारी या पदावर सेवानिवृत्त झालेल्या उच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांची नियुक्ती झाल्यास त्यांचे वेतन हे महाराष्ट्र नागरी सेवा [सेवा निवृत्ती वेतन] नियम १९८२ मधील नियम १५७ अंतर्गत असणाऱ्या तरतुदीनुसार निश्चित करण्यात येईल.

पीठासन अधिकाऱ्यांना उच्च न्यायालयाच्या न्यायाधिशांना लागू असलेल्या [सेवाशर्ती नियम कायदा १९५४][१९५४ चा कायदा क्रमांक:अठ्ठावीस] व उच्च न्यायालयाचे न्यायाधीश प्रवास भत्ते नियम १९५६ नुसार, सेवा सवलती देण्यात येतील.

पीठासन अधिकारी या पदावर नियुक्ती करण्यात येणारा अधिकारी हा पूर्णकालीन पीठासन अधिकारी म्हणून काम पाहील व त्याचा कार्यकाल जास्तीत जास्त तीन वर्षांपुरता शासनाने वेळोवेळी ठरवून दिल्याप्रमाणे निश्चित करता येईल.

पीठासन अधिकारी याच्या व्यतिरिक्त इतर कर्मचारी वर्ग विद्यापीठाने उपलब्ध करून द्यावयाचा आहे. हा कर्मचारी वर्ग उपलब्ध करून देतांना सध्या ज्या ३ विद्यापीठांमध्ये पीठासन अधिकारी व इतर पदे आहेत ती समायोजित करण्यात यावीत.

न्यायाधिकरणावर होणारा संपूर्ण खर्च हा विद्यापीठाच्या निधीतून भागवावयाचा आहे. प्रत्येक न्यायाधिकरणाला खालीलप्रमाणे सुट्टया राहतील :-

अ] उन्हाळी सुट्टया — ६ आठवडे

ब] दिवाळीची सुट्टी — १ आठवडा

क] नाताळ सुट्टी — १० दिवस

याशिवाय शासनाने वेळोवेळी केलेल्या आदेशानुसार पीठासन अधिकारी न्यायाधिकरणास सुट्टी देऊ शकतील.

न्यायाधिकरणांना दुसऱ्या व चौथ्या शनिवारी सुट्टी व तसेच रविवारी सुट्टी राहील.

प्रत्येक न्यायाधिकरणाकडे अकृषि विद्यापीठ व्यवस्थापन व त्यांचे कर्मचारी तसेच, विद्यापीठाशी संलग्नित असणाऱ्या अशासकीय महाविद्यालयांचे व्यवस्थापन व कर्मचारी यांच्यातील वादांचा/तक्रारींचा न्यायनिवाडा करणे तसेच, विद्यापीठातील

व त्यांच्या संलग्नित महाविद्यालयातील विद्यार्थ्यांच्या प्रवेशाचा न्यायनिवाडा करण्याचे काम [विद्यापीठ कायदा १९९४ मधील कलम ८८ अन्वये] राहील. या निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेली सर्व न्यायाधिकरणे प्रत्यक्षात अस्तित्वात आल्यानंतर जुनी न्यायाधिकरणे बंद करण्यात यावीत व त्यांच्याकडील प्रलंबित प्रकरणे नवीन न्यायाधिकरणांकडे वर्ग करावीत.

न्यायाधिकरणाच्या पीठासन अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४९६/व्यय-५, दि. १.७.१९९५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स्वाक्षरी)

[ शि. ब. सेन ]
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

शिक्षण संचालक [उ. शि.], महाराष्ट्र राज्य, पुणे
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती.
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, एस. एन. डी. टी. महिला विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव
कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
शिक्षण सहसंचालक [उच्च शिक्षण], नागपूर
शिक्षण सहसंचालक [उच्च शिक्षण], अमरावती
शिक्षण सहसंचालक [उच्च शिक्षण], मुंबई
शिक्षण सहसंचालक, [उच्च शिक्षण], नांदेड
शिक्षण सहसंचालक [उच्च शिक्षण], कोल्हापूर
शिक्षण सहसंचालक [उच्च शिक्षण], जळगाव
शिक्षण सहसंचालक [उच्च शिक्षण] पुणे
शिक्षण सहसंचालक [उच्च शिक्षण], औरंगाबाद
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ [लेखा व अनुज्ञेयता], मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ [लेखा परीक्षा], मुंबई/नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/अमरावती/औरंगाबाद/जळगांव/पुणे/कोल्हापूर/नांदेड
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग [व्यय-५], मंत्रालय, मुंबई
विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन विशि-१, २, ३, मशि-१, २, ३, ४, ५, उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभाग
निवड नस्ती, विशि-४